राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाचा सन २०१९-२० चा अखर्चित निधी पुनर्जिवित करून चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र. ६६/३-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : १४ जुलै, २०२०

**वाचा -**

१. संचालक आत्मा यांचे पत्र क्र.आत्मा/ प्र.क्र.०१/ लेखा /निधी मागणी/२६९/२०२०, दि.२०.४.२०२०
२. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफनं.३६-२८/२०१७- अेई, विस्तार कक्ष, दि.१८.३.२०२०
३. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. मि.सं./एफनं.२७-२/२०२०- अेई, (एफटीएसपी-८२७२६)दि.१५.४.२०२०

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत ( NMAET) कृषि विस्तार उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानात राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात राबविण्यात येते. सदर योजना सन २०१९-२० मध्ये राबविण्यासाठी एकूण रु. ११७५९.७३ लक्ष रकमेचा राज्य कृती विस्तार आराखडा (SEWP) तयार करण्यात आला असून त्याअंतर्गत केंद्र हिस्सा रु. ६७९५.५२ लक्ष व राज्य हिस्सा रु. ४९६४.२० लक्ष असा आहे आणि तो राज्य प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) मान्यतेने केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या मंजूरीसाठी सादर करण्यात आला होता. संदर्भ क्र. ३ च्या पत्रांन्वये केंद्र शासनाने २०१९-२० चा अखर्चीत निधी २०२०-२१ मध्ये विनियोग करण्यास मान्यता दिली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक २ अन्वये सर्वसाधारण प्रवर्गासाठी तिसऱ्या हप्त्याचा रू. २४६.४५ लक्ष निधी वितरित केला आहे.तथापि सदरचा केंद्र हिस्सा व केंद्र हिस्स्यास आवश्यक असलेला राज्य हिस्स्याचा निधी रू.१६४.३० लक्ष निधी वितरित झाला नाही. तसेच सर्वसाधारण प्रवर्गाकरिता यापूर्वी वितरित केलेल्या निधीपैकी केंद्र हिस्स्याचा रू. ४२.३७८०४ लक्ष व राज्य हिस्स्याचा रू. १७६.९२४१८ लक्ष निधी आयुक्त कृषि कार्यालयाने शासनास समर्पित केला आहे. त्यानुसार,

सर्वसाधारण प्रवर्गासाठी सन २०१९-२० ची शासनाकडे प्रलंबित असलेली व समर्पित केलेली रक्कम (केंद्र हिस्सा रू २८८.८३८०४ लक्ष व राज्य हिस्सा रू ३४१.२२४१८ ) लेखाशिर्षनिहाय २०२०-२१ या वर्षात खर्च करण्यासाठी बीडीएस प्रणालीवर वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

१. केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेंतर्गत सन २०१९-२० या वर्षातील सर्वसाधारण प्रवर्गाचा केंद्र हिस्स्याचा अखर्चित निधी रू. २८८.८३८०४ लक्ष (रू. दोन कोटी अठ्ठयांशी लक्ष त्र्याएंशी हजार आठशे चार फक्त) व राज्य हिस्स्याचा रू. ३४१.२२४१८ लक्ष (रू. तीन कोटी एकेचाळीस लक्ष बाविस हजार चारशे अठरा फक्त) सन २०२०-२१ या वर्षात पुनर्जिवित करून कृषि आयुक्तालयास बीडीएस प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

२. योजनेकरीता प्रत्यक्ष वितरीत करण्यात येणा-या निधीच्या मर्यादेत योजनेची अंमलबजावणी करावी, तसेच सदर खर्च चालू वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**अ) मागणी क्रमांक डी-३, २४०१ पीक संवर्धन, १०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण,**
**(०१) माहिती व प्रचार, (०१) (४४) - कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) -उप अभियान ( केंद्र पुरस्कत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ ४४४५), ३३ अर्थसहाय्य**

**ब) मागणी क्रमांक डी-३, २४०१ पीक संवर्धन, १०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण,**
**(०१) माहिती व प्रचार,(०१) (४३) - कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) -उप अभियान ( केंद्र पुरस्कत योजना) (राज्य हिस्सा ४०%) (२४०१ ४४३६), ३३ अर्थसहाय्य**

३. आयुक्त (कृषि) यांनी या योजनेसाठी केंद्र शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन योजनेंतर्गत उद्दिष्ट निहाय अंमलबजावणीच्या सविस्तर सूचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात, त्यामध्ये पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्यात याव्यात.

I.लाभार्थी निवडताना अत्यल्प व अल्प भू-धारक, महिला शेतकरी व मागासवर्गीय शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे व अशा लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाबाबत स्वतंत्र नोंदी ठेवाव्यात.

II.आत्मा कार्यक्रम सन २०२०-२१ साठी सर्वसारण प्रवर्गासाठी वितरीत करण्यात आलेला निधीचा केवळ त्याच प्रवर्गासाठी वापर करण्यात यावा.

III.या कार्यक्रमाचे मुल्यमापन त्रयस्थ संस्थेकडुन (Third Party Evaluation) करून घ्यावे.

IV.सन २०१९-२० मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये/ पंचायत समिती/जिल्हाधिकरी कार्यालयात लावण्यात यावी तसेच, ती यादी कृषि विभागाच्या वेबसाईटवर देखील प्रदर्शित करावी

४. सन २०२०-२१ मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस प्रणालीव्दारे वितरीत करावा.

६. सदर योजनेंतर्गत सन २०१९-२० मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५४/१४३१ दि. २५/०६/२०२० अन्वये तसेच वित्त विभागाने अनौ.संदर्भ क्र.१०७/२०२०/ व्यय-१ दि.०६/०७/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व सचिव कृषि यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१४१६०८३६२००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.07.14 17:26:45 +05'30'

**( अशोक आत्राम )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती -**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२. मा.राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय, पुणे
५. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, पुणे
६. सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून
७. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
१०.संचालक वनामती, नागपूर
११.उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१२.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६.कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८.महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१९.वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
२०.नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२१.कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२.निवड नस्ती (कार्यासन-३अे)